राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरणाच्या आस्थापनेवरील अस्थायी पदांना मुदतवाढ देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : आपना-१३१९/प्र.क्र.११६/१३-स**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०३ ऑक्टोबर, २०१९

वाचा :
१. शासन अधिसूचना, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक : सीएसएल-२०१३/प्र.क्र.१२४/१५-स, दिनांक ३० मार्च, २०१३.
२. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक : सववि-३११३/प्र.क्र. ७२/आस्था-१, दिनांक ३१ ऑक्टोबर, २०१३.
३. शासन निर्णय क्रमांक : आपना-१३१८/प्र.क्र.१८/१३-स, दि.२०/०३/२०१९.
४. सचिव, राज्य सहकारी निवडणुक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. रासनिप्रा/आस्थापना/कक्ष-१६/आस्था/अस्थाई पदे मुदतवाढ/६५८९/२०१९, दिनांक १६/०८/२०१९
५. शासन निर्णय, वित्त विभाग क्र. पदनि२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क. दि. ११/०९/२०१९.
६. सचिव, राज्य सहकारी निवडणुक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. रासनिप्रा/आस्थापना/कक्ष-१६/आस्था/अस्थाई पदे मुदतवाढ/६५८९/२०१९, दिनांक ०१.१०.२०१९

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० मधील कलम ७३ कब अन्वये राज्य निवडणूक आयोगाच्या धर्तीवर दिनांक ३०/०३/२०१३ च्या अधिसूचनेद्वारे राज्यातील सहकारी संस्थांच्या निवडणूका घेण्यासाठी स्वतंत्र राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण स्थापन करण्यात आली.

ज्या शासकीय विभाग आणि कार्यालये यांच्या मंजूर पदांचा आढावा उच्च स्तरीय सचिव समितीने मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व पदांना दि.०१/१०/२०१९ ते २९/०२/२०२० पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार उक्त विभागाच्या वाचा क्र. ५ येथील शासननिर्णयान्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना देण्यात आलेले आहेत

मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या उच्च स्तरीय समितीच्या बैठकीतील निर्णयाच्या अनुषंगाने प्राधिकरणासाठी मा. मंत्रिमंडळाने मान्यता दिलेल्या ४७ पदांमधून ३ पदे वगळून उर्वरित ४४ पदे निर्माण करण्यास उपरोक्त वाचा क्र ३ येथील शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आली आहे. त्यानुसार दिनांक २६/०५/२०१४ पासून राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरणाच्या कामकाजास सुरुवात झाली आहे. त्यानंतर वाचा येथील शासन निर्णय क्र.३ नुसार ४४ अस्थायी पदे दि. ३०/०९/२०१९ पर्यंत चालु ठेवण्यास

मंजूरी देण्यात आली. सदर मुदत दि. ३०/०९/२०१९ रोजी संपत असल्याने सचिव,राज्य सहकारी निवडणुक प्राधिकरण, पुणे यांनी सदर ४४ पदे चालु ठेवण्यास मान्यता देण्याची विनंती वाचा क्र.४ येथील पत्रान्वये केली असून, त्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

सचिव, राज्य सहकारी निवडणुक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी त्यांच्या दि. १६/०८/२०१९ च्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने राज्य सहकारी निवडणुक प्राधिकरणाच्या आस्थापनेवरील खाली नमूद तक्त्यातील ४४ अस्थायी पदांना दि. ०१/१०/२०१९ ते दि.२९/०२/८२०२० पर्यंत पुढे चालू ठेवण्यास शासन मंजूरी देत आहे.

| अ.क्र. | पदनाम | मंजूर पदांची संख्या |
|---|---|---|
| | **राजपत्रित** | |
| १. | आयुक्त | १ |
| २. | सचिव | १ |
| ३. | सह सहकारी निवडणूक आयुक्त | २ |
| ४. | उप सहकारी निवडणूक आयुक्त | २ |
| ५. | विधी सल्लागार अधिकारी | १ |
| ६. | सहाय्यक सहकारी निवडणूक आयुक्त | ६ |
| ७. | लेखा अधिकारी | १ |
| | **अराजपत्रित** | |
| ८. | सांख्यिकी अधिकारी | १ |
| ९. | उच्च श्रेणी लघुलेखक | २ |
| १०. | सहा. प्रशा. अधिकारी | १२ |
| ११. | लिपिक | १२ |
| | **वर्ग-४** | |
| १२. | शिपाई | ३ |

उपरोक्त ४४ अस्थायी पदांपैकी २० पदांवरील वेतन व भत्त्यांवरील खर्च, सन २०१९- २०२० या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून मागणी क्र. व्ही २,२०७० इतर प्रशासनिक सेवा (००) (८००) इतर खर्च, (००) (०१) राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण (२०७००८८२) (०१) या बाबींमधून व कंत्राटी तत्वावर सेवानिवृत्तामधून व बाह्यस्त्रोतावरील नियुक्त केलेल्या एकूण २४ पदांचे मासिक पारिश्रमिक याबाबीवर होणारा खर्च अनुदानातून मागणी क्र. व्ही २,२०७० इतर प्रशासनिक सेवा (००) (८००) इतर खर्च , (००)(०१) राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण (२०७००८८२) (१३) कार्यालयीन खर्च या बाबींमधून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक : पदनि-२०१६/प्र.क्र.०८/ आपुक, दिनांक ११ सप्टेंबर २०१९ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९१००४११३७५२५१०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Chaudhary Anil Jayaram

Digitally signed by Chaudhary Anil Jayaram
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co- Operation Marketing and Textile, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f26cf80358fa3133e4d85ddac30ae54b06c63743fd5510dc0ebca082b6c483ce, cn=Chaudhary Anil Jayaram
Date: 2019.10.04 11:38:33 +05'30'

**(अनिल ज. चौधरी)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल १ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
२. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर.
३. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
७. अपर मुख्य सचिव (सहकार) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
८. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९. सचिव, राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना पुढील कार्यवाहीस्तव अग्रेषित.
१०. निवडनस्ती-१३स.